बरोबर आपल्या सुरक्षितपणाविषयीं आपल्या प्रिय-पत्नीस पत्र व मराठ्यांशीं तह करण्याच्या ठरावाची याद हीं स्वस्थ चित्तानें निर्मळ लिहून रवाना केलीं होतीं; यावरून तो किती धैर्यशाली होता हें सहज लक्षांत येईल. तो आपल्या बायकोवर फार प्रीति करीत असे, तो फार लोभी नव्हता, दप्तरी जमाखर्च व इनसाफी काम, यांजमध्यें त्याच्या अमदानींत त्याचा हात कोणाच्यानें धरवला नाहीं. त्याची लिहिण्याची शैली फारच सरळ असे. फारशी व आरबी या भाषांत त्याची चांगली गति होती. संस्कृत त्याला येत नव्हतें; परंतु देवभोळ्या ब्राह्मण लोकांच्या हातून युक्तिप्रयुक्तीनें वेदादि पुस्तकें काढून त्यानेंच युरोपियन विद्वानांच्या हस्तगत केलीं. लोकांत आपलें तेज पाडण्याचा गुण याच्या ठायीं फार विलक्षण होता. बंगालच्या आसपासच्या राष्ट्रांत पैसा उत्पन्न करण्यासाठीं पुष्कळ जुलूम केला; परंतु खुद्द बंगाल्यास बिलकूल धका लाविला नाहीं, तेणें करून तो तेथच्या लोकांस अगदीं आईबापासारखा कृपावंत वाटे, व तोही त्यांजवर फार प्रीति करीत असे, तो निघून गेला तेव्हां त्यांला फार वाईट वाटलें; व आपली त्याला आठवण राहावी म्हणून, त्यांनीं त्याला पुष्कळ नजराणे व मानपत्रें दिलीं. तो त्यांस इतका प्रिय वाटत असे कीं, त्यांच्या बायका त्याच्या गुणांच्या ओंव्या गात असत; त्यांपैकीं हल्लींही तिकडे पुष्कळ कानीं पडतात.

समाप्त.